"आमच्या शुभेच्छा त्यांना कळवा," फिलिपचेन्को म्हणाले. रूकाविश्निकोव पुढे म्हणाले :

"अच्छा! तुमच्या पृथ्वीवर उतरण्याची वाट पाहतो!"

१९ जुलैला दुपारी ३ वाजता 'सयूझ' आणि 'अपोलो' यांना एकमेकांपासून विलग करण्याचे काम सुरू झाले. आमच्या अमेरिकन मित्रांनी दिशा धरण्याची हालचाल केली आणि आम्ही विलग व्हायला तयार आहोत किंवा नाही याची विचारणा केली. आम्ही होकार कळवला. 'अपोलो' अंतराळवीरांनी अंतराळयान जोडण्याच्या यंत्रणेच्या खिट्टया सोडवून घेतल्या आणि वेगळे होण्याची सर्व तयारी झाल्याचे कळवले.

स्प्रिंगच्या रेट्याने आमची दोन याने हळूच एकमेकांपासून अलग झाली.

आमच्यापासून दूर जाताना अमेरिकन अंतराळवीरांनी आमच्या 'सयूझ'ची छायाचित्रे काढली. आमचे यान सूर्याच्या उजेडात किती अंशात होते हे शोधण्यास काही काळानंतर संशोधकांनी या छायाचित्रांचा उपयोग केला. आपल्या अग्निबाणांच्या इंजिनांना गती देऊन, 'अपोलो'ने कृत्रिम सूर्यग्रहणाचा प्रयोग चालू केला.

अविस्मरणीय देखावा! कुबासोवला आणि मला भीती वाटत होती की, 'अपोलो'च्या शेपटाकडून बाहेर पडणाऱ्या ज्वालांमुळे ग्रहणाचा देखावा पाहण्यात आम्हाला अडथळा येईल. सूर्याच्या वरच्या भागाच्या फिल्म आम्हाला चांगल्या मिळतील किंवा नाही ते अजून मला माहीत नाही. पण त्यावेळी दिसणारे रंग एवढे देखणे आणि अद्भुत होते की गवाक्षामधून बाजूला होणे मला शक्य होईना. सूर्याच्या वरच्या भागावरील रंगांनी माझ्यावर एवढी जबरदस्त मोहिनी घातली होती की, मोहीमेवरून परत घरी आल्याक्षणी मी पहिली गोष्ट काय केली असेल तर त्या रंगांना कॅन्व्हासवर उमटवण्याची!

आमच्या यानापासून २२० मीटर अंतर असताना 'अपोलो'ने गती कमी करण्याची इंजिने चालू केली. पुन्हा एकत्र जोडण्यासाठी आमच्या यानांनी हालचाली केल्या. यावेळी 'सयूझ' क्रियाशील होते आणि 'अपोलो' निष्क्रीय होते.

दुपारी ३ वाजून ४० मिनिटांनी दुसऱ्यांदा याने जोडण्याची क्रिया पुरी झाली. पण यावेळी अंतराळवीरांची अदलाबदल करण्याचा कार्यक्रम नव्हता. आम्ही संध्याकाळी ६ वाजून २६ मिनिटांनी अखेरचे अलग झालो.

अच्छा 'अपोलो', आमच्या अमेरिकन मित्रांनो, टॉम स्टॅफोर्ड, डिक स्लेटन आणि वान्या ब्रँड—आमचा तुम्हाला रामराम! त्या आपल्या सुंदर निळ्या पृथ्वीवर, आपल्या एकाच भूमीवर, आपल्या घरी, आपण पुन्हा एकत्र भेटेपर्यंत आमुचा रामराम घ्यावा!

मॉस्को वेळेप्रमाणे रात्री ११ वाजता, 'सयूझ' बरोबर टक्कर टाळण्यासाठी, 'अपोलो' ने जाताजाता एक हालचाल केली आणि लौकरच ते दिसेनासे झाले.

'अपोलो'चा निरोप घेतल्यानंतरच्या २४ तासांमध्ये आम्ही अनेक जीवशास्त्रीय प्रयोग केले. कारण काही ठाम निष्कर्ष काढण्यासाठी, शास्त्रज्ञांना आमच्यापासून जास्तीत जास्त माहिती पाहिजे होती. आम्ही सूर्योदयाचीही छायाचित्रे घेतली. हवामानतज्ज्ञांनी आणि दृष्टिसाधक यंत्रे तयार करणाऱ्यांनी आम्हाला हे काम सांगितले होते.

मोहीम संपत आली होती. आम्हाला मिळालेल्या फलश्रुतींसह सर्व साहित्य आणि उपकरणे कुबासोवने खाली उतरणाऱ्या कुपीत भरली, व खाली उतरण्याच्या यंत्रणांची पुन्हा चाचणी घेतली. मग शेवटचा टेलिव्हिजन कार्यक्रम झाला. त्यानंतर फक्त रेडिओ दळणवळण उरले.

कार्यक्रमात असलेले सर्व प्रयोग पार पाडण्यात आले होते. आम्ही पृथ्वीवर परत यायची तयारी करीत होतो. दुसऱ्या दिवशी आम्ही गती कमी करण्याची इंजिने चालू केली असती आणि नंतर अवघ्या ४५ मिनिटात आमच्या मायभूमीवर खाली उतरलो असतो.

भक्कम मातीवर पाऊल ठेवण्याची कल्पना! २१ जुलैच्या सकाळी, आमच्या ९५ व्या प्रदक्षिणेला, कुबासोवने आणि मी आमचे अंतराळपोषाख चढवले आणि खाली उतरण्याच्या कुपीत शिरलो. दिशा अचूक होती. यानाची सर्व यंत्रणा सुरळीत काम करीत होती.

आमच्या ९६ व्या फेरीला, अटलांटिक महासागरावरच्या असेन्शन बेटाच्या प्रदेशात, आमच्या यानाने कक्षा सोडली आणि पृथ्वीच्या दिशेने खाली यायला सुरुवात केली. त्या क्षणी आम्ही २१७ किलोमीटर उंचीवर होतो आणि 'अपोलो'पासून सुमारे ८०० किलोमीटर दूर होतो.

आम्ही मध्य आफ्रिकेवर असताना आमची बत्ती देणारी काडतुसे उडाली व खाली उतरणाऱ्या कुपीपासून सामग्री आणि कक्षीय परिमाणे वेगळी झाली. आमची "अंतराळातील मेजवानी" ज्यात झाली होती ते कक्षीय परिमाण सोडून द्यावे लागले ही दुःखाची बाब होती. पण त्याला काही इलाज नव्हता. पुढील क्रिया पार पाडण्यासाठी जे केवळ अत्यावश्यक असते तेवढेच ठेवले जाते, बाकी सर्व समुद्रात फेकून दिले जाते.

"यानात सर्व सुरळीत. नेमक्या वेळी विलग झालो, गती स्थिर," मी पृथ्वीवर संदेश दिला. उड्डाण नियंत्रण केंद्राने उत्तर दिले.

"तुम्हा दोघांचे संभाषण आम्हाला ऐकू येतेय."

कुबासोव गुरगुरला :

"तुम्ही कशाला ऐकताय? चोरून ऐकणं बरं नव्हे!"

आम्ही यान मार्गाला लावले. खाली उतरणाऱ्या इंजिनांचा आवाज आता ऐकू येत होता. आम्हाला छान वाटत होते.

सर्व काही गच्च आवळून बसवले होते. खाली येणे छान चालले होते. आम्ही एव्हाना कास्पियन समुद्र पार केला होता. आमच्या वेगवान उड्डाणाला वातावरणाचा विरोध होत होता

आणि खाली उतरणाऱ्या परिमाणाच्या संरक्षक उष्णता-रोधक कवचाला ज्वाळा लपेटत होत्या.

"परिस्थिती सुरळीत, गवाक्षांवर काजळी धरलीय," मी पृथ्वीवर कळवले.

"कसं काय वाटतंय?"

"झकास. धन्यवाद."

"ठरलेल्या जागेपासून २५ किलोमीटर अंतरावर तुम्ही उतरता आहात."

खाली उतरण्याच्या क्रियेला मंद करणारी हवाई छत्री कोणत्याही क्षणी आता उघडली असती आणि तिच्या पाठोपाठ मुख्य भली मोठी हवाई छत्री उघडली असती. काही मिनिटातच आम्ही पृथ्वीवर उतरलो असतो.

दुपारच्या १ वाजून ५० मिनिटांनी आम्ही खाली उतरलो. आमच्या दिशेने हेलिकॉप्टर भिरभिरत येत होती आणि लोक धावत आले. शोधक तुकडीने आमचे गवाक्ष उघडले, पट्टे सोडायला आणि यानाच्या जीवरक्षक पद्धतीपासून अंतराळपोषाख वेगळे करायला आम्हाला मदत केली. काही क्षणातच आमच्याभोवती वैमानिक, डॉक्टर आणि पत्रकार यांचा गराडा पडला. आमच्यावर प्रश्नांची सरबत्ती उडाली. आम्ही त्या सर्वांना एकदम उत्तर देण्याचा प्रयत्न केला, प्रत्येकाचे आभार मानले. मी म्हणालो:

"माझ्या प्रिय मित्रांनो, उड्डाण संपलंय. ते खूप अवघड होतं. खूपच. पण आता हलकं वाटतंय, कारण आम्ही घरी परतलोय. आम्हाला चक्कर येतेय, आनंदामुळं, थकव्यामुळं, रात्र रात्र झोप नसल्यामुळं, आम्हाला गरगरल्यासारखं होतंय. आम्ही एकूण २० तासांपेक्षा जास्त झोपलेलो नाही. तुमच्या पाठिंब्याबद्दल धन्यवाद."

कुबासोव म्हणत होता:

"आमची अमेरिकन अंतराळयानाबरोबर भेट झाली, अमेरिकन अंतराळवीरांना आम्ही भेटलो आणि त्यांच्याशी हस्तांदोलन केलं. आता आम्ही पृथ्वीवर परतलोय याचा आम्हाला आनंद झालाय."

एका मित्राने आम्हाला खडूचा तुकडा दिला. आमच्या लाडक्या 'सयूझ-१९'च्या काजळलेल्या पृष्ठभागावर कुबासोवने आणि मी मोठ्या अक्षरांमध्ये लिहिले:

"स्पसिबो."

रशियन भाषेत "धन्यवाद."

... २५ जुलै १९७५ रोजी, अमेरिकन अंतराळयान 'अपोलो' आपल्या तीन अंतराळवीरांसकट अलगदपणे प्रशांत महासागरावर उतरले. असचाप्र मोहीम पूर्णपणे पार पडली.

## निरोपाचा शब्द

माझ्या तरुण मित्रा, मी तुला 'अपोलो'-'सयूझ' अंतराळ उड्डाणाबद्दलची माहिती सांगितली आणि त्याची मी काढलेली चित्रेही तुला दाखवली. अंतराळ संशोधनात नव्या, आंतरराष्ट्रीय कार्याला या उड्डाणाने आरंभ करून दिला. लौकरच इतर याने ताऱ्यांकडे झेपावतील आणि कार्यचतुर, खात्रीलायक व अत्यंत उपयुक्त अशा अंतराळयानांचे इतर लोक नियंत्रण करतील.

कदाचित तू सुद्धा यातील एखाद्या अग्निबाणांमधून उड्डाण करशील. माझ्या तरुण मित्रा, मी मनापासून तुला सुयश चिंतितो.

आणि सूर्यावरचे वारे चांगले वारे ठरोत.

**वाचकांना विनंती**

या पुस्तकाबाबत, त्याच्या अनुवादाबाबत, रचनेबाबत आपले मत समजावून घेण्यास व भावी प्रकाशनांसंबंधी आपल्या सूचना जाणून घेण्यास 'प्रगती प्रकाशना'ला आनंद वाटेल.

आपली मते पुढील पत्त्यावर कृपया कळवावी: १७, झुबोव्स्की बुलेवार्द, मॉस्को, सोविएत संघ.

